**भाषा संचालनालयातील गट-क मधील लिपिक-टंकलेखक संवर्गातील सरळसेवा कोटयातील पदे वित्त विभाग,शासन निर्णय दिनांक २ जून २०१५ च्या कमाल मर्यादेतून वगळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

मराठी भाषा विभाग

शासन निर्णय क्रमांकः भासंस-२०१७/प्र.क्र.१६ /आस्था-२,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: २० फेब्रुवारी, २०१७.

**वाचा-**

१) वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१,दि.०२.०६.२०१५.

२) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०१५/प्र.क्र.२९०/का.१२, दि. १६.०७.२०१५.

३) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्रमांक : अकंपा १२१५/प्र.क्र.४७/आठ, दि. २८.१०.२०१५.

४) सामान्य प्रशासन विभाग,पत्र क्र.एसआरव्ही २०१७/प्र.क्र.१/का.१२ दि.१३.०२.२०१७.

**प्रस्तावना -**

वित्त विभागाच्या दिनांक ०२.०६.२०१५ च्या शासन निर्णयान्वये वेतनावरील खर्च नियंत्रित करण्याकरिता सरळसेवेच्या कोटयातील रिक्त असणा-या ५०% किंवा एकूण संवर्गाच्या ४% यापैकी जे कमी असेल इतकीच पदे भरण्यात यावीत असा निर्णय घेण्यात आला आहे. वित्त विभाग,शासन निर्णय,दिनांक ०२.०६.२०१५ मध्ये विहित केलेल्या टक्केवारीपेक्षा जास्त प्रमाणात रिक्त पदे भरण्याचे प्रस्तावांवर निर्णय घेण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय दिनांक १६.०७.२०१५ नुसार प्रधान सचिव(सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली आहे. भाषा संचालनालयातील गट-क(अराजपत्रित) मधील लिपिक-टंकलेखक संवर्गातील (वेतन संरचना रुपये ५२००-२०२००+ग्रेड वेतन रुपये १९००) सरळसेवा कोटयातील पदे तातडीने भरणे आवश्यक असल्याने त्याबाबतचा प्रस्ताव प्रधान सचिव(सेवा),सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या दि.०४.०२.२०१७ च्या बैठकीमध्ये सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावावर समितीने भाषा संचालनालयातील लिपिक-टंकलेखक गट-क(अराजपत्रित) संवर्गातील रिक्त पदे भरण्याची निकड विचारात घेऊन सरळसेवा कोटयातील रिक्त पदांपैकी ५ पदे भरण्यास मान्यता दिली आहे.

**शासन निर्णय -**

भाषा संचालनालयातील गट-क(अराजपत्रित) मधील लिपिक-टंकलेखक संवर्गातील (वेतन संरचना रुपये ५२००-२०२००+ग्रेड वेतन रुपये १९००)सरळसेवा कोटयातील पदे वित्त विभागाच्या दिनांक ०२.०६.२०१५ च्या शासन निर्णयाच्या कमाल मर्यादेतून वगळण्यात येऊन याबाबत प्रधान सचिव(सेवा),सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखालील समितीने केलेल्या शिफारशीनुसार ५ पदे भरण्यात यावीत. तथापि,सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय दिनांक २८.१०.२०१५ मधील तरतुदीनुसार समितीने मान्यता दिलेल्या ५ पदांपैकी १०% पदे म्हणजेच १ पद अनुकंपा नियुक्तीने व उर्वरित ४ पदे महाराष्ट्र लोकसेवा

आयोगामार्फत भरण्याची कार्यवाही भाषा संचालनालयाने करावी. सदर कार्यवाही प्रमाणित बिंदुनामावलीनुसार करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०१७०२२०१७२४००७१३३** असा आहे.

हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nanda Maruti Raut

Digitally signed by Nanda Maruti Raut
Date: 2017.02.22 13:23:15 +05'30'

(नंदा मा.राऊत)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. भाषा संचालक,भाषा संचालनालय, प्रशासकीय इमारत, ५ वा मजला,डॉ.आंबेडकर उद्यानाजवळ, शासकीय वसाहत,वांद्रे(पूर्व), मुंबई - ४०० ०५१.
२. उप सचिव(कार्यासन १२),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.
३. उप सचिव(कार्यासन वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.
४. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा),महाराष्ट्र,मुंबई.
५. महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी (भाषा संचालनालयामार्फत)
७. निवड नस्ती(का.आस्था-२)